“आंतरराष्ट्रीय योगदिन” सर्व शैक्षणिक व
शासकीय कार्यालयांमध्ये साजरा करण्याबाबत.
दिनांक २१ जून, २०१८.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण ३०१७/प्र.क्र.४१(II)/क्रीयुसे १

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०८ जून, २०१८.

**वाचा :**

1) **शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-३०१८/प्र.क्र.९६/क्रीयुसे-१, दिनांक ०८ जून, २०१६.**
2) **सचिव, आयुर्वेद योग व प्राकृतिक चिकित्सा, युनानी, सिध्द एवं होमियोपथी (आयुष) मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र.डीओ नं. एस-११०१२/७/२०१८-वाय ॲन्ड एन सेल, दिनांक ०२.०२.२०१८ चे पत्र.**

**शासन परिपत्रक :**

संयुक्त राष्ट्रसंघाने “२१ जून” हा दिवस आंतरराष्ट्रीय योगदिन म्हणून घोषित केलेला आहे. ५००० वर्षाहून अधिक परंपरा असणारी योग विद्या ही भारताने जगाला दिलेली देणगी आहे. व्यक्तीच्या शारिरीक आणि आत्मिक विकासासाठी योग विद्या सहाय्यिभूत आहे. चौथ्या जागतिक योगा दिनाचे आयोजन दि.२१.०६.२०१८ रोजी करण्यात येणार आहे. या कार्यक्रमाचे आयोजन राज्यातील युवा वर्ग तसेच सर्व सामान्य व्यक्ती यांना मोठया प्रमाणावर सामावून घेऊन करावयाचे आहे. या संदर्भात योगा उत्सव, चर्चासत्र, कार्यशाळा, सांस्कृतिक कार्यक्रम इ. चे आयोजन शाळा, महाविद्यालये, विद्यापिठे यामधील विद्यार्थ्यांकडून तसेच एन.एस.एस., नेहरु युवा केंद्र इ. युवा संघटनांमार्फत योगा संबंधी कार्यक्रमाचे आयोजन करण्यात यावे. आंतरराष्ट्रीय योगा दिनाच्या कार्यक्रमाच्या आयोजना संदर्भातील अन्य माहिती www.ayush.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आली आहे.

२. जिल्हा पातळीवर जिल्हाधिकारी व विभाग पातळीवर विभागीय आयुक्त यांनी हा कार्यक्रम यशस्वी होईल यासाठी पुढाकार घ्यावा.

३. या उपक्रमाकरीता आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांचे स्तरावर राज्यस्तरीय नोडल अधिकारी म्हणून नेमणुक करण्यात यावी.

४. उपरोक्त आंतरराष्ट्रीय योगादिन साजरा करण्यासाठी प्रशिक्षकांना प्रशिक्षण देणे, योगादिन आयोजनाबाबत मार्गदर्शन करणे इ. साठी १)कैवल्यधाम, लोणावळा, पुणे २) दि योगा इस्टिट्यूट, सांताक्रूझ, मुंबई ३) रमामणी अय्यंगार मेमोरियल योगा इस्टिट्यूट, पुणे या तीन प्रतिथयश योग संस्थांनी सहकार्य देण्याचे मान्य केले आहे. आंतरराष्ट्रीय योगदिनाचे औचित्य साधून राज्यातील सर्व शाळांमध्ये योगदिन साजरा करण्याबाबतच्या सूचना शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत सर्व क्षेत्रिय कार्यालयांना याद्वारे देण्यात येत आहेत. आंतरराष्ट्रीय योगदिन सर्व शाळांसोबतच राज्यातील सर्व शासकीय कार्यालयांमध्ये साजरा करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. राज्यातील सर्व शाळांमध्ये दिनांक २१ जून, २०१८ रोजी योगदिन साजरा करण्यात येणार येणार आहे. त्याचप्रमाणे सर्व शासकीय कार्यालयांमध्ये आंतरराष्ट्रीय योगदिन साजरा करण्यात यावा.

३. उपरोक्त संदर्भात स्थानिक स्तरावर उपलब्ध होणाऱ्या साहित्यामधून योगासाठी लागणाऱ्या मॅटस् व अन्य साधनांचा वापर करण्यास प्राधान्य देण्यात यावे. तसेच योग विषयक कार्यक्रमाच्या आयोजनामध्ये विकलांग /दिव्यांग व्यक्तींचा सहभाग घेण्याच्या दृष्टीने उचित कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०८१७३६५४९६२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2018.06.08 17:38:45 +05'30'

( राजेंद्र पवार)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद /विधानसभा.
४. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक
५. मा.मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य,
६. मंत्रालयीन विभागातील सर्व सचिव, प्रधान सचिव, अपर मुख्य सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभाग,
८. प्रबंधक, मूळ न्यायशाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
९. प्रबंधक, अपील न्यायशाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१०.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
११.सचिव, महाराष्ट्र लोक सेवा आयोग, मुंबई,
१२.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१३.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.आयुक्त (क्रीडा व युवक सेवा) महाराष्ट्र राज्य,पुणे.
१५.सर्व विभागीय आयुक्त,
१६.सर्व जिल्हाधिकारी,
१७.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१८.मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,

१८. आयुक्त, सर्व महानगरपालिका,

१९. आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासन भवन, पहिला मजला, मुंबई-२०.,

२०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२. (त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी आवश्यक ते प्रसिध्दीपत्रक निर्गमित करावे, तसेच आकाशवाणी व दूरदर्शनद्वारे प्रसिध्दी द्यावी.)

२१. सचिव, कैवल्यधाम, लोणावळा, पुणे. (आयुक्त, क्री.व यु.से.सं.,पुणे यांच्यामार्फत).

२२. सचिव,दि योगा इस्टिट्यूट, श्री.योगेद्र मार्ग, प्रभात कॉलनी, सांताक्रूझ, मुंबई. (आयुक्त, क्री.व यु.से.सं.,पुणे यांच्यामार्फत).

२३. सचिव,रमामणी अय्यंगार मेमोरियल योगा इस्टिट्यूट, पुणे (आयुक्त, क्री.व यु.से.सं.,पुणे यांच्यामार्फत).

२४. सर्व सह/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२५. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.

२६. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.

२७. सर्व विभागीय शिक्षण उप संचालक.

२८. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हापरिषद, शिक्षण निरिक्षक, मुंबई(उत्तर/दक्षिण/पश्चिम)

२९. शिक्षणाधिकारी/प्रशासन अधिकारी, महानगरपालिका.

३०. सर्व उप संचालक, क्रीडा व युवक सेवा (आयुक्त, क्री.व यु.से.सं.,पुणे यांच्यामार्फत).

३१. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, क्रीडा व युवक सेवा (आयुक्त, क्री.व यु.से.सं.,पुणे यांच्यामार्फत).

३२. कक्ष अधिकारी (एसडी-४), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

३३. अवर सचिव, क्रीयुसे-२ व ३.

३४. निवड नस्ती, क्रीयुसे-१.